**भोगवटा मुल्याच्या सदोष आकारणीबाबत कालबध्द पध्दतीने लेखा परिक्षण करुन तफावत आढळून आल्यास वसुली करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक: लोलेस-२०२१/प्र.क्र.१४८/ज-१**
मदाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १८ जानेवारी, २०२२.

वाचा :- भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांच्या सन २०१७-१८ च्या तेहतीसाव्या अहवालातील शिफारस क्र.१.४३.

**शासन परिपत्रक :-**

भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांच्या अहवालातील प्रलंबित परिच्छेद व लोकलेखा समितीच्या अहवालातील शिफारशी बाबत प्राधान्याने कार्यवाही करण्याबाबत.सन २०१७-१८ च्या तेहतीसाव्या अहवालतील शिफारस क्र.१.४३ मध्ये पुढीलप्रमाणे अभिप्राय नोंदविण्यात आले आहेत:-

"महालेखाकारांनी महसूल व वन विभागांतर्गत अशाप्रकारच्या प्रकरणांची केवळ नमुन्यादाखल तपासणी केली असता विभागाने कृषितर दराऐवजी कृषि दर लावल्यामुळे भोगवटा मुल्याची कमी आकारणी, चुकीचे बाजारमुल्य लावल्यामुळे भोगवटा मुल्याची चुकीची आकारणी, वाटपाचे अंतिम आदेश निर्गमित न केल्यामुळे भोगवटा मुल्याची वसुली न होणे, सहकारी गृहनिर्माण संस्थेवर भोगवटा मुल्याची कमी आकारणी करणे असे गंभीर आक्षेप नोंदविलेले आहेत. या सर्व प्रकरणात शासनस्तरावरुन रकमेची आकरणी सदोष व कमी झाल्याचे स्पष्टपणे सिध्द झालेली असून विभागाने त्यांची वसूली देखील केली आहे. महालेखाकारांनी हे आक्षेप नोंदविले नसते तर विभागाने याची कोणतीही दखल घेतली नसती व एवढया मोठया महसूलास शासनाला मुकावे लागले असते, ही अतिशय गंभीर बाब असून विभागाचे अधिकारी शासनाला प्राप्त होणाऱ्या महसूलाबाबत सजग नसून अत्यंत बेजबाबदारपणे व निष्काळजीपणाने ही आकारणी करीत असल्याचे समितीसमोर सिध्द झाले आहे. समिती याबाबत तीव्र नापसंती व्यक्त करीत आहे.परंतू महालेखाकारांनी लेखापरिक्षणाच्यावेळी राज्यातील सर्वच प्रकरणांची छाननी केलेली नसून केवळ नमुन्यादाखल काही विशिष्ट प्रकरणांची तपासणी केल्यानंतर अशा गंभीर बाबी निदर्शनास आल्या आहेत. राज्यात अशा अन्य प्रकरणीदेखील अशाचप्रकारे निश्चितरित्या आकारणी कमी झाल्याचे समितीचे स्पष्ट मत आहे. त्यामुळे केवळ महालेखाकारांच्या आक्षेपापूरती ही वसुली मर्यादित न ठेवता विभागाने अशाप्रकारच्या दिलेल्या जागेच्या भोगवटा मुल्याच्या तफावतीबाबत सर्व प्रकरणांचे विशेष पथकाद्वारे

कालबध्द पध्दतीने लेखापरिक्षण करावे व यात आकारणी कमी झालेली असल्यास त्याची वसूली करावी व संबंधित अधिकाऱ्यावर कडक कारवाई करावी व यासंदर्भात केलेल्या कार्यवाहीचा अहवाल समितीस महिन्यांत देण्यात यावा अशी समितीची शिफारस आहे."

उपरोक्त तपशिलावरुन स्पष्ट होते की, भोगवटा मुल्याच्या सदोष आकारणीमुळे, त्याचप्रमाणे अशा आकारणी संदर्भात कोणत्याही प्रकराची पर्यवेक्षीय देखरेख ( Supervisory Monitoring ) न झाल्यामुळे शासनाच्या महूसलाचे नुकसान झाले आहे.

तरी, उपरोक्त पार्श्वभूमिवर लोकलेखा समतीच्या शिफारशीस अनुलक्षून सर्व जिल्हाधिकारी यांना अशाप्रकारच्या प्रदान केलेल्या जागेच्या भोगवटा मुल्याच्या सर्व प्रकरणांचे विशेष पथकाद्वारे कालबध्द पध्दतीने लेखापरिक्षण करावे व यात आकारणी कमी झालेली असल्यास / तफावत असल्यास त्याची वसुली करुन संबंधित जबाबदार अधिकाऱ्यांवर कडक कारवाई करावी. त्याचप्रमाणे अशा प्रकारचे लेखापरिक्षण कालबध्दरित्या करावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२२०११८११२१५२३२१९ असा आहे, हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येते आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUHAS MADHAV MAMDAPURKAR

Digitally signed by SUHAS MADHAV MAMDAPURKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=15e9cd7730234dc2963eb61397dd04240c15d02a5a148c43a83593ac725fd19c, pseudonym=1A2F622DE5904FF048601C73A184349D5EEECBBB, serialNumber=F1B00E7181536EEDD7B08803397FED3A96870CA795C4D9384B72F43A5A066D99, cn=SUHAS MADHAV MAMDAPURKAR
Date: 2022.01.18 11:25:31 +05'30'

**( सुहास ममदापूरकर )**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल,महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राजभवन,मलबार हिल,मुंबई-३२.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई-३२.
३) मा.मंत्री (महसूल ), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई-३२.
४) मा.राज्यमंत्री (महसूल) , यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई-३२.
५) मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य, मंत्रालय,मुंबई-३२.
६) अपर मुख्य सचिव,(महसूल) महसूल व वन विभाग याचे स्वीय सहायक
७) सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
८) जमाबंदी आयुक्त आणि संचालक,भूमी अभिलेख,पुणे.
९) प्रधान सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
१०) महासंचालक,माहिती व जनसंपर्क संचालनालय,मुंबई.
११) सर्व विभागीय आयुक्त / सर्व जिल्हाधिकारी.

१२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१३) महालेखापाल (लेखा परिक्षा ) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१४) अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.
१५) निवासी लेखा अधिकारी,मुंबई.
१६) सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग.
१७) सर्व सहसचिव/उपसचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
१८) सर्व "ज " समूह कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
१९) निवड नस्ती (कार्यासन ज-१ )